**राज्यातील अल्पसंख्यांक बहुल क्षेत्रात क्षेत्रविकास कार्यक्रम राबविण्यासाठी अनुदान वितरित करण्यास मंजुरी देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : अविवि-२०१०/प्र.क्र.१०५/का.७
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
**दिनांक : २५/०१/२०११**

**संदर्भ** :- शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग, क्रमांक : अविवि-२०१०/प्र.क्र. १०५/का.७, दि. १०/०८/२०१०.

**शासन निर्णय :-**

अल्पसंख्याक विकास विभागाने सन २००८-०९ या वर्षापासून राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्रविकास कार्यक्रम कार्यान्वित केला असून संदर्भाधीन शासन निर्णयान्वये ही योजना सन २०१०-११ या वर्षात देखील राबविण्यास मंजुरी देण्यात आली आहे.

२. क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत सन २०१०-११ या वर्षात अनुदान मिळण्यासाठी राज्यातील विविध नगरपालिकांकडून शासनास आत्तापर्यंत प्राप्त झालेल्या प्रस्तावांची छाननी करण्यात आली. छाननीअंती विहित निकषांनुसार अनुदान मिळण्यास पहिल्या टप्प्यात पात्र ठरलेल्या नगरपालिकांना या शासन निर्णयासोबतच्या परिशिष्ट "अ" मध्ये दर्शविल्याप्रमाणे क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत अनुदान मंजूर करण्यात येत असून हे अनुदान संबंधित नगरपालिका ज्या जिल्हयांमध्ये स्थित आहेत, त्या जिल्हयांचे जिल्हाधिकारी यांच्या स्वाधीन करण्यात येत आहे.

३. संबंधित नगरपालिकांना मंजूर करण्यात आलेले अनुदान वितरित करण्यासाठी संबंधित जिल्हाधिकारी नियंत्रक अधिकारी आणि आहरण व संवितरण अधिकारी म्हणून काम पाहतील.

४. राज्यातील नगरपालिकांनी मागणी केल्यानुसार ज्या विवक्षित प्रयोजनासाठी निधि मंजूर करण्यात आला आहे, केवळ त्याच प्रयोजनासाठी संबंधित नगरपालिकांनी निधि खर्ची टाकणे अनिवार्य आहे. संबधित जिल्हाधिकाऱ्यांकडून अनुदान वितरित करण्यात आल्यानंतर संबंधित नगरपालिकांनी सहा महिन्यांच्या कालावधीत प्रस्तावात नमूद केलेली कामे पूर्ण करणे आवश्यक आहे व याबाबतची उपयोजिता प्रमाणपत्रे या शासन निर्णयाच्या परिशिष्ट "ब" मध्ये विहित केलेल्या नमुन्यात अल्पसंख्याक विकास विभागाकडे सादर करणे आवश्यक आहे. क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत राज्यातील नगरपालिकांनी हाती घेतलेल्या विकासकामांच्या प्रगतीबाबत संनियंत्रण करुन त्याबाबतचा अहवाल संबंधित जिल्हाधिकारी यांनी शासनास सादर करावा.

५. या योजनेंतर्गत होणारा खर्च " मागणी क्र. झेडई-१ ए, मुख्यलेखाशिर्ष २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण ०२ समाजकल्याण २०० इतर कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (०१) (०७) अल्पसंख्याक सकेंद्रित

क्षेत्रातील क्षेत्र विकास कार्यक्रमाकरिता सहायक अनुदान (२२३५-ए-१३१) ३१ सहायक अनुदान" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ या वर्षाकरिता मंजुर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या दि. १८/०५/२०१० च्या परिपत्रकानुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर (www.maharashtra. gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्याचा **संगणक संकेतांक २०११०१२५१६२४५१००१** असा आहे.

**( तु. पि. पवार )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.राज्यपालांचे सचिव,
मा.मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव,
मा.उप मुख्यमंत्र्यांचे सचिव,
मा.मंत्री / मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव,
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,
अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव / सचिव सर्व मंत्रालयीन विभाग,
महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
महालेखापाल १/२ (लेखापरीक्षा) , मुंबई / नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व विभागीय आयुक्त,
आयुक्त, नगरपालिका प्रशासन, मुंबई,
सर्व जिल्हाधिकारी,
आयुक्त, महानगरपालिका,
व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
मुख्याधिकारी, नगरपालिका,
सर्व मंत्रालयीन विभाग,
*सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय (प्रसिध्दीसाठी),
*निवडनस्ती,*

## शासन निर्णय,अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि-२०१०/प्र.क्र.१०५/का.७,दि.२५/०१/२०११

## परिशिष्ट - "अ"

**महाराष्ट्र राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांकरिता क्षेत्र विकास कार्यक्रम**
**महानगरपालिका/नगरपालिकांचे जिल्हानिहाय निधी वितरणाचे विवरणपत्र.**

(रु. लाखांत)

| अ. क्र. | जिल्हा | महानगरपालिका / नगरपालिकेचे नाव | | उद्देश | निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | अहमदनगर | १ | पाथर्डी नगरपालिका (क वर्ग) | कसबा येथे स.न. २४७ मध्ये बालवाडी इमारत बांधणे | ३.३९ |
| २ | जळगांव | १ | फैजपूर नगरपालिका (क वर्ग) | मिल्लतनगर गट नं ६२५ व ६२६ या खुल्या जागेत बालवाडी केंद्र बांधणे | १० |
| ३ | अकोला | १ | तेल्हारा नगरपालिका (क वर्ग) | १) गौरवशिल भारसाकळे ते नाना सपकाळ यांच्या घरापर्यंत कॉंक्रीट रोड करणे.<br>२) जब्बारखॉं यांचे घर ते शे. साबीर यांच्या घरापर्यंत कॉंक्रीट रोड करणे<br>३) सत्यभामा इंगळे ते राजकन्या पंचांग यांच्या घरापर्यंत कॉंक्रीट रोड करणे<br>४) दिलीप हिवराळे ते जिवन इंगळे यांच्या घरापर्यंत कॉंक्रीट रोड करणे | १० |
| ४ | अमरावती | १ | शेंदुरजनघाट नगरपालिका (क वर्ग) | १) वार्ड नं.२ मध्ये रज्जाक मास्टर यांचे घरापासून ते शकील यांचे घरापर्यंत कॉंक्रिट रस्ता बांधणे व अकबर ते शराफत भाई यांचे घरापर्यंत रस्ता बांधणे<br>२) वॉर्ड क्र.२ मध्ये शेरखॉं ते शरीफभाई यांचे घरापर्यंत कॉंक्रिट रस्ता, मजनेखॉं ते नबाब शे. गफ्फार नाली बांधकाम करणे | १० |
| ५ | परभणी | १ | पाथरी नगरपालिका (क वर्ग) | जोड कुंआ मोहल्ला येथे अंगणवाडी बालवाडी केंद्राचे बांधकाम करणे | १० |
| | | २ | सोनपेठ नगरपालिका (क वर्ग) | इनामदार वसाहत येथे आर.सी.सी. रस्ता तयार करणे भाग २ | १० |
| ६ | ठाणे | १ | ठाणे महानगरपालिका | १) प्रभाग क्र. ४६ मध्ये मुल्ला हाऊस डिकोस्टा अपार्टमेट मस्जीद परीसरात गटार व पेवरब्लॉक पध्दतीने पायावाटा करणे<br>२) प्रभाग क्र. ४६ मध्ये अब्दुल हमीद व्यायाम शाळा व रहमत नगर परीसरात गटार व पेवरब्लॉक पध्दतीने पायवाटा करणे | २० |
| ७ | उस्मानाबाद | १ | मुरुम नगरपालिका (क वर्ग) | मुस्लीम दफनभूमीसाठी पाईप कन्व्हर्ट बांधकाम करणे व रस्ता डांबरीकरण करणे | १० |
| | | २ | कळंब नगरपालिका (क वर्ग) | आ.क्र. १६ कब्रस्थान सभोवती कंपाऊंड वॉल बांधकाम करणे | १० |

| | | | | | |
|---|---|---|---|---|---|
| | | ३ | भूम नगरपालिका<br>(क वर्ग) | १) गराडा गल्ली येथे आश्रुखाना बांधकाम करणे,<br>२)मोगलवाडा (कसबा) येथे सार्वजनिक स्वच्छतागृह बांधकाम करणे,<br>३) गराडा गल्ली घोलपघर ते मस्जीद नाली बांधकाम करणे | **१०** |
| | | **एकूण १०** | | **(Grand Total) एकूण**<br>**(एक कोटी तीन लाख एकोणचाळीस हजार फक्त)** | **१०३,३९,०००/-** |

## परिशिष्ट - "ब"

## उपयोजिता प्रमाणपत्र

प्रमाणित करण्यात येते की, अल्पसंख्याक विकास विभागाने राज्यातील अल्पसंख्याक बहुल नागरी क्षेत्रांसाठी कार्यान्वित केलेल्या क्षेत्रविकास कार्यक्रमांतर्गत शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग, क्र. अविवि-२०१०/प्र.क्र. १०५/का-७, दि. अन्वये वितरित केलेला रु. (अक्षरी रु. ) एवढा निधि पुढील विकासकामांसाठी उपयोगात आणला आहे.

| विकासकाम/ विकासकामे | वापरलेली रक्कम |
|---|---|
| अ | |
| ब | |
| क | |
| ड | |

असेही प्रमाणित करण्यात येते की, क्षेत्र विकास कार्यक्रमांतर्गत ज्या निकष / अटींनुसार शासनाने अनुदान मंजूर केले होते, त्या निकष/ अटींची यथायोग्यरित्या पुर्तता करण्यात आली आहे. तसेच ज्या प्रयोजनाकरिता निधि मंजूर करण्यात आला होता, त्याच प्रयोजनाकरिता निधिचा प्रत्यक्षात विनियोग झाला आहे, याची खातरजमा करण्याकरिता मी खालील दस्तऐवज/अभिलेखांची तपासणी केली आहे.

तपासणी केलेल्या दस्तऐवज/अभिलेखांचे प्रकार

१. प्रमाणक आणि पुस्तक लेखा (Vouchers and Book of Accounts)

२. मोजणी पुस्तके (Measurement Books)

३. सहायक अनुदान / कर्ज नोंदवही (Grant-in-aid/ Loan Register)

४. खर्च नोंदवही (Expenditure Register)

| आयुक्त, महानगरपालिका/ मुख्याधिकारी, नगरपालिका यांची स्वाक्षरी | संबंधित महानगरपालिका / नगरपालिका ज्या जिल्हयात स्थित आहेत त्या जिल्हयाचे जिल्हाधिकारी यांची प्रतिस्वाक्षरी |
|---|---|
| नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा | नाव<br>तारीख<br>स्थळ<br>कार्यालय मुद्रा |